# उंट निघाला

# फेरफटका मारायला.........





# उंट निघाला फेरफटका मारायला......

मराठी : गार्गी लागू

जंगलामधे अजून काळोख होता.

सगळीकडे शांत शांत होत. सगळे प्राणी सुस्त होते. वाराही पडला होता. झाडाची पान गळून पडत नव्हती. गवताचं पातही हलत नव्हत.

अस कां होत.....माहित आहे ? कारण ती वेळच अशी होती. दिवस आणि रात्र यांच्या मधली......रात्र संपत आली होती आणि दिवस उजाडतच होता. .....

जंगलातली रात्र खूप काळोखी असते
आणि हळू हळू संपते

ही गोष्ट सुरू होते तेव्हा जंगलात खूप
काळोख होता. आणि वातावरण खूप  गरम होते.
सगळे प्राणी सुस्त होते......पण सगळ्यात
सुस्त  होता वाघ.....!

जंगलामधून जाणार्या एका रस्त्याच्या
कडेला असलेल्या झाडाच्या खाली वाघ पहुडला होता.
पान, फुल, गवत यामधे स्वत:ला लपेटून
घेतल्यामुळे तो कुणाला दिसणं शक्यच नव्हत.
शिवाय काळोखही होताच....





अचानक आकाशातून प्रकाशाची तिरीप आली आणि आकाश, जंगल, एव्हढच काय पण हवाही उजळायला लागली.

तेव्हाच जंगलाच्या मध्यावरून जाणार्या त्या लांबलचक रस्त्यावरून ........खूप दूर ..अगदी क्षितीजातवळ, जिथे जमिन आणि आकाश एकत्र आल्यासारखे भासतात......तिथे कुणितरी चालत होतं.....

आता वाघ झोपेत असल्यासारखा वाटत होता. पण त्याच्याकडे निरखून पाहिलत तर तुमच्या लक्षात येईल की त्याचा एक डोळा .....कुणीतरी चालत येत होत......त्याच्या दिशेने ......थोडा किलकिला झाला होता.

वाघाचा एक डोळा असा किलकिला होतो त्यावेळी तुमच्या लक्षात यायला हव की वाघ झोपलेला नव्हताच...जसा तुम्हाला वाटत होता.

आता चालत येणार 'कुणीतरी' .....ज्याला वाघ डोळा किलकिला करून बघत होता....जवळ जवळ येत चाललं होत....रस्त्यावरचा उजेड वाढत चालला होता आणि आता ......चालत येणारं कुणीतरी तुम्ही पाहू शकत होता.

-----

.........आश्चर्य वाटलं ना.....



तो एक सुंदर उंट होता.

.......खूपच सुंदर उंट ! त्याचे डोळे करड्या रंगाचे होते. सकाळी सकाळी फेरफटका मारण्यासाठी निघाला होता. मान ताठ वर करून, डौलदार संथ  पाऊले टाकित ........सकाळच्या प्रसन्न, निर्मळ वातावरणाचा आनंद घेत......तांबूस होत जाणार आकाश निरखत.......

त्याचवेळी पालापाचोळ्यात, झाडाखाली पहुडलेला वाघ विचार करीत होता की हा सुंदर उंट झाडाच्या सावलीच्या कडेपर्यंत आला की त्याच्यावर झडप घालायची.......



पण......त्या रस्त्यावरून हळू हळू आपल्याच नादात चालत येणार्या उंटाला पहाणारा एकटा वाघच नव्हता......

त्या झाडावर, वाघ पहुडला होता त्याच्या बरोबर वर, एका उंच फांदीवर एक वानर बसले होते. त्याला कल्पना होती की वाघाच्या मनांत काय चाललेलं आहे. त्याने अजिबात आवाज न होऊ देता एक नारळ तोडला आणि मनाशी विचार केला की वाघ उंटावर झडप घालायच्या क्षणी बरोबर त्याच्या डोक्यावर नारळ पाडीन.



उंट रस्त्यावरून डौलदारपणे चालत पुढे येतच होता. चालतांना तो कधी उजवीकडे, कधी डावीकडे बघत होता. आकाश आता अधिकाधिक प्रकाशित होत चाललं होत.

पण त्या सुंदर उंटाला बघणारे फक्त वाघ आणि वानरच नव्हते.

त्याच झाडावर एक छोटी खारपण बसली होती. ती आपल्या चमकणार्या डोळ्यांनी सर्व पहात होती. ती हळूच आवाज न करता वानराच्या मागे त्याच्या शेपटी जवळ येऊन बसली आणि स्वत:शी म्हणाली, “वानर वाघाच्या डोक्यावर नारळ पाडायला निघेल त्याचवेळी मी त्याची शेपटी कापून टाकिन!”





आताही उंट रस्त्यावरून डौलदारपणे चालत पुढे येतच होता. चालतांना तो कधी उजवीकडे, कधी डावीकडे बघत होता. आकाश आता अधिकाधिक प्रकाशित होत चाललं होत.

त्या सुंदर उंटाला बघणारे फक्त वाघ, वानर, आणि खारच नव्हते. ....तर एक छोटा पक्षीहि होता. आणि त्याच्या लक्षात आल होत की वाघ, वानर आणि खार यांच्या मनात काय विचार चालले आहेत. तो मनाशी म्हणाला, “वा, मला माहित आहे मी काय करणार आहे.......ही खार, वानराची शेपूट कापण्या आधीच मी माझ्या पंजाच्या नखांनी खारीच्या डोक्यावर हल्ला करीन.”

आता वाघ इतका बेचैन झाला होता त्याला आपली शेपटी स्थिर ठेवणे अशक्य होते. तो शेपटी एकदा याबाजूला तर एकदा दूसर्या बाजूला हलवायला लागला.





इथे तर उंट जवळ येत होता......जास्त जवळ येत होता. सूर्य तापत होता. ......आणखी तापत चालला होता. वातावरण चांगलच गरम होऊ लागलं होत....आणखी गरम होत चालल होत..... आणि उंट झाडाच्या सावलीजवळ येऊ लागला.....तसे वाघ, वानर, खार, पक्षी सगळे सावध होऊन तयारीत बसले होते.



उंट अचानक थांबला. त्याने त्याची उंच मान आकाशाकडे वळविली. एव्हढ मोठ्ठ तोंड उघडून मोठ्ठी जांभई दिली आणि आपल्या मिठ्ठास आवाजांत म्हणाला , “वाटतं.....आता परत जाव.....”



वाघ बघतच राहीला....खर म्हणजे तो उंटावर झडपच घालणार होता.........

पण त्याने उंटावर झडप घातली नाही......

आणि वानराने नारळ झाडावरून पाडला नाही....

खारीनेही वानराची शेपटी कापली नाही.....

आणि पक्षानेही खारीवर हल्ला केला नाही...

त्या सर्वांनी ठरविलेले काहीच केले नाही....

थोडा वेळ सगळेच शांत होते....कसलाच आवाजही आला नाही.

छोटा पक्षी जोरजोरात हसायला लागला.

त्याचा आवाज सगळ्या जंगलात घुमला. खार ची ची करायला लागली. वानर आनंदाने उड्या मारायला लागले. जंगल्यातल्या सगळ्या प्राण्यांना आवाजाने जाग आली. ते विचारायला लागले, "काय झाले? ..काय झालं?”





आता तुम्हाला माहित आहे , काय झालं होत.......काहीच झाल नव्हत.....तो सुंदर उंट रस्त्यावरून परत गेला होता...ज्या वाटेवरून तो आला होता.

वाघ लाजेने काळोख्या जंगलात गुपचुप परत गेला.

......आकाशात आता सूर्य चमकायला लागला होता.

समाप्त